**सन २०२०-२१ या वर्षात केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत- वन शेती उप अभियान अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी राबविण्यासाठी रु.१५ लक्ष निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वनशेती-०७१९/ प्र.क्र.८९ (भाग-२)/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०७ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ :-

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: शाशेअ-२०१७/प्र.क्र.१२६/४अे, दि.८ डिसेंबर, २०१७.
२. अवर सचिव कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.१-३/२०२०- NRM-SMAF, (FTS-८४०३०), दि. २३ जून, २०१९.
३. सहायक आयुक्त (SMAF), कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.१-३/२०२०-NRM-SMAF, दि.२ जुलै, २०२०.
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.वनशेती- ०७२०/प्र.क्र.८९/१४-अे, दि-२० ऑगस्ट, २०२०.
५. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.१८ स्प्टेंबर, २०२०.

प्रस्तावना:

सन २०१७-१८ या वर्षापासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अंतर्गत- वन शेती उप अभियान राबविण्यात येत आहे. सदर उप-अभियानामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०: ४० असे आहे. सदर उप-अभियान राज्यात राबविण्यासाठी संदर्भाधीन दि.८ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२ जुलै, २०२० च्या पत्रान्वये, सन २०२०-२१ या वर्षासाठी एकूण रु.३३५.०२ लक्ष निधीच्या प्रकल्पास मान्यता दिलेली आहे. यामध्ये केंद्र हिस्सा रु.२०१ लक्ष असून राज्य हिस्सा रु.१३४.०२ लक्ष एवढा आहे.

सन २०२०-२१ या वर्षात कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२३ जून, २०२० च्या पत्रान्वये पहिल्या हप्त्याचा रु.**१६०** लक्ष निधी वितरीत केला आहे. यामध्ये सर्वसाधारण प्रवर्गाचा रु.१२६.०८ लक्ष, अनुसूचित जाती रु.१८.८८ लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु.१५.०४ लक्ष एवढ्या रकमेचा समावेश आहे. त्यापैकी अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु.९.०० लक्ष व त्यास आवश्यक समरुप राज्य हिश्श्याचा रु.६.०० लक्ष असा एकूण रु.१५.०० लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

१. सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत- वन शेती उप अभियानांतर्गत "अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी" रु.१५.०० लक्ष (अक्षरी रूपये पंधरा लक्ष फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे. सदर निधीचे केंद्र व राज्य हिश्श्याचे विवरण पुढीलप्रमाणे आहे :-

**( रक्कम रु. लक्ष)**

| योजनेचे नाव | अनुसूचित जमाती प्रवर्ग | | |
|---|---|---|---|
| | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण निधी |
| राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत वनशेती उप- अभियान | ९.०० | ६.०० | १५.०० |

२. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- वनशेती उप- अभियान अंतर्गत "अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी" वितरीत करण्यात आलेला केंद्र हिश्श्याचा रु.९ लक्ष (अक्षरी: रुपये नऊ लक्ष फक्त) व राज्य हिश्श्याचा रु. ६ लक्ष (अक्षरी: रुपये सहा लक्ष फक्त), असा एकूण रु.१५.०० लक्ष (अक्षरी: रुपये पंधरा लक्ष फक्त) निधी पुढील लेखाशीर्षांतर्गत चालू आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा :-

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| **मागणी क्रमांक-टी-५**<br>२४०१,पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(००) (३३) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- वन शेती उप- अभियान (कें.पु.यो.) (अजाउयो) (केंद्र हिस्सा-६०%) (कार्यक्रम) (२४०१A८४२), ३३ अर्थसहाय्य, | **मागणी क्रमांक-टी-५**<br>२४०१,पीक संवर्धन,<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(००) (३५) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- वन शेती उप- अभियान (कें.पु.यो.) (अ.जा.उ.यो) (राज्य हिस्सा-४०%) (कार्यक्रम) (२४०१A८५१), ३३ अर्थसहाय्य, |

३. सदर निधी फक्त अनुसुचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांकरीता खर्च करण्यात यावा.

४. सदर निधी लाभार्थ्यांना PFMS प्रणालीद्वारे त्यांच्या आधार संल्गन बँक खात्यावर वितरीत होत असल्याची खातरजमा आयुक्त, कृषी यांनी करावी.

५. सदर निधी खर्च करताना वनशेती उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन दि.८ डिसेंबर, २०१७ चा शासन निर्णय व संदर्भाधीन केंद्र शासनाच्या दि.२३ जून, २०२० व दि. २ जुलै, २०१९ च्या पत्रातील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरून, सर्व वित्तीय कायदे/ नियमांचे/ प्रक्रियेचे व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठल्याही शासन निर्णयाचा वा परिपत्रकाचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

७. सदर निधी, केंद्र शासनाने दि.२ जुलै, २०२० च्या पत्रान्वये कळविलेल्या उप अभियानांतर्गत चालू वर्षासाठी मंजूर वार्षिक आराखड्यानुसार अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

८. सदर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी आयुक्त, कृषी यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदर निधीचे आहरण व संवितरण करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे |
| २. | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौ.संदर्भ क्र.२२२९/व्यय, दि.११ सप्टेंबर, २०२० अन्वये व आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन दि.१८ स्पटेंबर, २०२० च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००७१२३६०९२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.10.07 12:37:49 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. आयुक्त, सामाजिक न्याय, पुणे.
७. कुलगुरू, कृषी विद्यापीठे (सर्व )
८. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय,पुणे
९. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०.सर्व संचालक / सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
११.विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१२. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१३.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
१४.महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
१५.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१६.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१७.मा. राज्यमंत्री ( कृषि व फलोत्पादन ) यांचे खाजगी सचिव
१८. मा. मंत्री ( कृषि/फलोत्पादन ) यांचे खाजगी सचिव
१९. निवड नस्ती (कार्यासन -१४अे).